"Here we come back to the problem of the difference between culture and civilization....but machine is not culture; it is at best civilization. A man may possess the highest thing, the machine can produce, he may fly in the air and freely move under the surface of the ocean, he may telephone and telegraph from his office-room in Cologne or Berlin, New York or Chicago, he may hear the music in reception of the Zeppelin, in Los Angles, The New Year's bells of St. Paul's in London, and opening speeches in the Australian Parliament; but for this flaunting splendour, he stands yet far from being a man of culture. He enjoyes all the amenities of civilization at the most..... Culture is an attribute of the soul. If a man or a people is unable to plunge into its own self, and even for a time forget the outer mechanism of life in order to turn to its inner depths, to the beautiful, the exaulted, the mystical, to art and poery—then, with the progress of time, it will never escape the fate, which is sure to overtake it. Perhaps the will shall still be there, throbbing and vital, but its soul will be dried up."

"येथें पुनश्च संस्कृति आणि भौतिक प्रगति यांत काय फरक आहे हाच प्रश्न पडतो. परंतु यंत्र म्हणजे कांहीं सुसंस्कृतता नव्हे. फार झालें तर त्याला सुधारणा म्हणतां येईल. यंत्राच्या साहाय्यानें मिळणारी अतिश्रेष्ठ परिस्थिति माणसास लाभूं शकेल. तो आकाशांत संचार करील, पाणी तरून जाईल, एका ठिकाणीं बसून कलोन, बर्लिन, न्यूयार्क, अथवा शिकागो अशा दूरदूरच्या ठिकाणीं संदेश पाठवूं शकेल, अथवा लॉस एजंल्समधील झेपेलीनच्या सन्मानार्थ होणारें गायन, इंग्लंडमधील सेंट पालच्या मंदिरांतील नवसंवत्सराच्या प्रारंभदिनीं वाजणाऱ्या घंटांचा नाद किंवा ऑस्ट्रेलियांतील पार्लमेंटच्या उद्घाटनप्रसंगीं होणारें स्वागतपर भाषण तो ऐकूं शकेल. परंतु इतक्या दर्पोद्धत गोष्टी करूनही तो सुसंस्कृत माणूस असेलच असें म्हणतां येणार नाहीं. अधिकांत अधिक

इतकेंच म्हणतां येईल कीं शास्त्रीय ज्ञानाच्या पूर्ण वाढीचा तो लाभ घेऊं शकतो. परंतु सुखाचा संबंध व्यक्तीच्या अंतरात्म्याशीं आहे. वरील सर्व गोष्टी करूनही जर मनुष्यास स्वानंद घेतां आला नाहीं, जर या यांत्रिक कृत्रिमतेच्या बाजारांत तो स्वतःस एक क्षणभरही विसरूं शकला नाहीं, त्याच्या अत्युच्च आणि गूढ अशा आध्यात्मिक अस्तित्वाची जाणीव त्याला येऊं शकली नाहीं किंवा त्याचा तो अनुभव घेऊं शकला नाहीं, काव्य, कला इत्यादि आनंदास तो पारखा होऊं लागला तर या काळाच्या सपाट्यांत त्याचें भवितव्य निश्चितपणें ठरलेलेंच आहे. त्याच्या मनुष्यपणाचा खरा झरा आटून जाऊन तो केवळ पशु बनणें भाग आहे. फार तर त्या खऱ्या मनुष्यत्वाची थोडीशी जाणीव त्याच्या अंतःकरणांत हळुहळूं स्फुरत राहील इतकेंच काय तें!"

डॉ. पॉल राहबॅक यांचें हें म्हणणें आज अक्षरशः खरें ठरत आहे. फारच मोठा विनाशाचा प्रसंग आला म्हणजे हल्लीं कित्येक पाश्चात्य समाजशास्त्रज्ञ एकत्र जमून तो कसा टाळतां येईल याचा भयकंपित अंतःकरणानें विचार करतात. यु.नो., झूरिच कॉन्फरन्सेस व त्यांतून व्यक्त होणारे विचार, जागतिक शांततेच्या योजना, इत्यादि या अंतःकरणाच्या सांदीकोपऱ्यांत स्फुरणाऱ्या मनुष्यत्वाचेंच निदर्शन होत. पण खऱ्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीवांचून व जीवनाच्याच उलगड्यावांचून हें सारें कांहीं व्यर्थ ठरत आहे. आज प्रत्यक्ष भौतिक दृष्टिकोनाला आधारभूत असलेलें शास्त्र अथवा विज्ञान ज्यांनीं उत्पन्न केलें त्यांनाच आपलें कोठेंतरी चुकत आहे, सारें आपण शोधलें तरी मनुष्य, अंतःकरण, जीवन, अस्मिता, या मूलभूत महत्त्वाच्या गोष्टींचा मुळींच विचार केला नाहीं या जाणिवेची टोंचणी लागली आहे. असा विचार केल्याविना विश्वविचार पूर्ण होत नाहीं व जडसृष्टीचाच केवळ विचार करून तिच्यावर हवें तेवढें साम्राज्य गाजवितां आलें तरी त्यानें आपल्याला आपली मालकी मुळींच संपादन करतां येत नाहीं, याची खंत त्यांच्या मनालाही वाटूं लागली आहे. मी एका प्रसिद्ध भौतिक शास्त्रज्ञाचेच उद्गार येथें देतों. म्हणजे त्यावरून जन्मभर

विज्ञानाच्या खोड्यांत स्वत:स अडकविलेल्या माणसाच्याही अंत:-करणांत शेवटीं कोणती टोचणी लागली याची कल्पना येईल. हे उद्गार डॉ. एलेक्सिस कॅरेल (Alexis Carrel) यांचे आहेत. हा संशोधक आपल्या आयुष्याचीं कितीतरी वर्षें संशोधनांत घालवून प्रावीण्याच्या अनेक पदव्या संपादन करून जगप्रसिद्ध झालेला आहे. त्याला संशोधनाबद्दल इ. स. १९१२ मध्यें 'नोबेल प्राईझ' मिळालें होतें व तो नुकताच इ. स. १९४४ सालीं म्हणजे अवघ्या आठ वर्षांपूर्वीं नोव्हेंबर महिन्यांत पॅरिस येथें दिवंगत झाला. आपल्या ('Man, the unknown) या विख्यात पुस्तकांत तो म्हणतो :

In learning the secret of the constitution and of the properties of matter, we have gained the mastery of almost everything which exists on the surface of the earth excepting ourselves. Those countries that have blindly adopted the spirit and the techniques of industrial civilization, Russia as well as England, France and Germany, are exposed to the same dangers as the United States. Humanity's attention must turn from the machines and the world of inanimate matter to the body and the soul of man, to the organic and mental processes which have created the machines and the universe of Newton and Einstines."

"जडद्रव्याच्या घटनेचा व अंतर्गत द्रव्यांचा सूक्ष्म अभ्यास करून त्यांतील गूढ उकरून काढण्याचा अविरत प्रयत्न करून आम्ही पृथ्वीवर राहणाऱ्या सर्व वस्तुजाताचें स्वामित्व संपादन केलें. पण आम्हांला स्वत:वर मात्र स्वामित्व मिळवितां आलेलें नाहीं. आंधळे-पणानें ज्यांनीं औद्योगिक अथवा यांत्रिक संस्कृतीचें तंत्र व तिनें दिलेला दृष्टिकोन स्वीकारला ते रशिया, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इत्यादि मोठमोठे देश अमेरिकेला ज्या संकटाला तोंड देणें भाग पडत आहे, त्याच संकटाच्या खाईंत सांपडले. मानवतेचें सारें लक्ष आतां यंत्र व जड भौतिकतेची अथवा निसर्गाची सृष्टि यांच्या-वरून उडवून तें आतां मनुष्याचा जीव, व अंतरात्मा यावरच

केंद्रित केलें पाहिजे. त्याची महत्ता आपल्याला समजली नाहीं हें केवळ दुर्दैव होय. ज्याच्या सामर्थ्यानें न्यूटन व आईनस्टीन यांनीं जग व यंत्र निर्माण केलें त्याच्याकडे म्हणजेच मानवी अस्मितेकडे आतां लक्ष केंद्रित केलें पाहिजे."

एलेक्सीस कॅरेल हा कांहीं तत्त्वज्ञानी नसून उभी हयात त्यानें भौतिक शास्त्रांच्या संशोधनांत घालविली होती हें ध्यानांत घेतलें म्हणजे त्याच्या या उद्‌गारांचें खरें महत्त्व ध्यानांत येतें. आतां शास्त्रज्ञांना जीवन हें अत्यंत व्यापक असून विश्वजीवनाचा व व्यक्तिजीवनाचा संपूर्ण विचार करीत असतां कोणत्याही एकाच गोष्टीवर भर देणें चुकीचें आहे हें कळूं लागून त्यांचा प्रामाण्यवाद रुंदावत चालला आहे. श्रीमत् भगवद्‌गीतेनें हजारों वर्षांपूर्वींच प्रामाण्यवादाच्या या विस्तृततेची आवश्यकता ओळखून अस्मितेच्या संशोधनाचा मार्ग जगांतील सर्व विचारवंत संशोधकांना सांगितलेला आहे. आज शास्त्रज्ञांना माणसाला जगाविषयीं व माणसामाणसाविषयीं प्रेम कां वाटत नाहीं याचें मोठें कोडें पडलें असून व्हाईटहेडसारखे कित्येक शास्त्रज्ञ त्या दृष्टीनें विश्व व मनुष्य यांच्यांत सचेतन घटनात्मक संबंध आहे, त्याच प्रमाणें विश्व आणि त्यांतील चराचर वस्तु एकजीव आहेत, मानव पिंडाप्रमाणेंच ब्रह्मांड हें देखील परस्परवस्तुसंलग्न आणि सूत्रबद्ध अशी एक सचेतन संघटना आहे असें प्रतिपादन करूं लागले आहेत. इतकेंच नव्हे तर चैतन्य किंवा जीवतत्त्व हें केवळ वनस्पति, प्राणी व मानव यांच्यापुरतेंच व्याप्त असतें असें नसून ते प्रोटान, इलेक्ट्रॉन, अणु, दगड, माती, खडक इत्यादि सर्व जड गणल्या गेलेल्या पदार्थांच्याही अंतर्यामीं वास करून असतें, अणुरेणूंपासून मानवापर्यंतच्या यच्चयावत् वस्तु या सचेतन घटना आहेत व आकाश आणि काळ या द्विविध सूत्रामध्यें विणल्या गेलेल्या सर्व घटनामय वस्तु चैतन्यपूर्ण असतात असें प्रतिपादन करूं लागलेले आहेत. किंबहुना असा दृष्टिकोन स्वीकारल्याशिवाय जडवादी दृष्टिकोनाच्या अंगीकारानें मानवतेवर येणारी आपत्ति टळणें कधींही शक्य नाहीं हें त्यांना स्पष्टपणें कळून चुकलें आहे. प्रत्येक वस्तु भौतिक अंतरंग

व आत्मिक अंतरंग अशा दोन अंगांनीं युक्त असते. अणु, दगड, जल, हवा, तरु, काष्ठ, माती, खडक, ग्रह, तारे, नक्षत्रें, वनस्पति, प्राणी, मानव वगैरे विश्वांतल्या एकूण एक वस्तूंना वर वर्णिलेलीं दोन अंगें असतात. विश्व हें एक ब्रह्मांड शरीर असून तें सृजनशील अशा अनंत वस्तूंनीं ओतप्रोत भरलेलें आहे. त्या सर्व वस्तु परस्पर-संमिश्र, परस्परसंलग्न आणि परस्परांतर्यामी आहेत. (Inter-related interconnected and mutually immanent) इतकेंच नव्हे तर त्या एकजीव म्हणजे त्यांचे अंतरात्मेही परस्परसंमिश्र, परस्पर-संलग्न व परस्परांतर्यामी आहेत. ज्याप्रमाणें मानवपिंड हा जीवपेशी, मज्जातंतू, अस्थि, चर्म, नाड्या, रक्तपेशी, मांसपेशी इत्यादींच्या सचेतन घटनांनीं गच्च भरलेला असतो, त्याचप्रमाणें असंख्य, वेगवेगळ्या, लहानमोठ्या परस्परसंमिश्र, परस्परांतर्यामी अशा प्रकारच्या चराचरभावरूप सचेतन घटनांनीं हें विश्वब्रह्मांड ओतप्रोत भरलेलें आहे. मानव शरीरांतील रक्तमांसादि सचेतन घटनांप्रमाणेंच विश्वांतील स्थावर, जंगम पदार्थांच्या सर्व सजीव घटना या देखील एकजीवच आहेत. म्हणजे मानवी देह जसा एका आत्म्याच्या धाग्यांत गोंवला गेला आहे, त्याचप्रमाणें अखिल विश्व हें सुद्धां चैतन्यरूपी एक सूत्रामध्यें गुंफिलें गेलें असून मानव पिंड हा त्या विश्व ब्रह्मांडांतील एक सूक्ष्म ब्रह्मांडच आहे. दोन्हींतील सामान्य तत्त्वें आणि गुणधर्म हीं सर्वसाधारणपणें एकच आहेत. हें नवें तत्त्वज्ञान आधुनिक विसाव्या शतकांतील विज्ञानाला पूर्णपणें धरून असून हा दृष्टिकोन स्वीकारला तरच विश्वाविषयीं आंतरिक प्रेम मनुष्याला वाटूं लागेल व मानवामानवांत सहानुकंपा, सह-भावना, प्रेम इत्यादि उत्पन्न होऊं शकेल असें या तत्त्वज्ञांचें म्हणणें आहे. (स. रं. सुखठणककृत व्हाईटहेड तत्त्वज्ञान व सामाजिक नीति).

विश्वगोलाविषयीं, मानवी जीवनाविषयीं, व त्यांच्या परस्पर-संबंधाविषयीं आज इतक्या भीषण मनुष्यसंहारानंतर पाश्चात्य शास्त्रज्ञांना हें जें वाटूं लागलें आहे तें नुसतें वाटूं लागण्याऐवजीं वा उपकरणांच्या तोटक्या साधनांनीं निर्माण होणाऱ्या अस्थिर वैज्ञानिक कल्पनांच्या साहाय्यानें तें सिद्ध करीत बसण्याऐवजीं

श्रीमद् भगवद्‌गीतेनें ही गोष्ट प्रत्यक्ष ज्ञानपूर्वक सहस्रावधि वर्षांपूर्वीं ठामपणें लोकांना सांगितली. यावरून गीताकारांच्या सुसूक्ष्म व विश्वव्यापी दिव्य प्रतिभेची कल्पना येते.

## विश्व व त्याच्या मूलतत्त्वांचा भगवद्‌गीतेचा उलगडा

जन्मल्यापासूनच मनुष्यजीवनाचा इंद्रियांच्या द्वारें जगाशीं संबंध येतो. ज्याच्याशीं संबंध येतो त्या या जगाचा उपभोग्य वस्तु म्हणून मनुष्य वेगवेगळ्या प्रकारें उपभोग घेत असतो. म्हणून जगाचा व मनुष्याचा संबंध उपभोग्य व उपभोक्ता या नात्याचा आहे ही गोष्ट सर्वांच्या अनुभवाला येणारी आहे. तत्त्वज्ञांचें या बाबतींत एकमत आहे. उपभोग्य वस्तुजात हें जड असून उपभोक्ता हा सचेतन आहे हा त्या दोघांतील महत्त्वाचा फरक सर्वांनाच अनुभवास येतो. या दोन पदार्थांचें मूलतत्त्व काय असावें हा प्रश्न सर्वच तत्त्वज्ञांना जगाच्या प्रारंभापासून विचारार्ह वाटलेला आहे. हे दोन्ही पदार्थ मुळांतच अत्यंत भिन्न आहेत असें स्थूल दृष्टीनें अनुभवास येत असलें तरी तेंच आत्यंतिक सत्य नाहीं. अनादि कालापासून हें जडचैतन्याचे चालत आलेले प्रवाह नीट तपासले तर असें आढळून येईल कीं, हा जडाचा प्रवाह चेतनाच्या लाभासाठीं प्रवृत्त होत असून चेतन त्यापासून स्वतःचा विविध स्वरूपाचा लाभ करून घेत असतो.

ॲलेक्सिस कॅरेलसारख्या आजच्या विख्यात भौतिक शास्त्रज्ञाला ज्या अस्मितेचा विचार करण्याची आवश्यकता आज वाटूं लागली आहे तिचा विचार केल्यावांचून जगाचा विचार कधींही पूर्ण होणें शक्य नाहीं, हें भारतीय तत्त्वज्ञांनीं पूर्वींच ओळखलें होतें. संपूर्ण विश्वाच्या सर्व गुणवैशिष्टयांचा, अल्पप्रमाणांत कां होईना, पण अंतर्भाव मनुष्याच्या शरिरांत झालेला असल्यामुळें मनुष्यशरीर हें विश्वाचें एक प्रकारें प्रतिनिधीभूत आहे. म्हणून विश्वविचारांत पहिलें स्थान या मनुष्यशरीराच्या विचाराला आहे. “ पिंडीं तें ब्रह्मांडीं ” यालाच म्हणत असतात. गीतेनें याला क्षेत्रक्षेत्रज्ञविचार अशी शास्त्रशुद्ध संज्ञा वापरलेली आहे.

## क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार

विवेकशक्ति जागृत झालेला कोणीही मनुष्य पहिल्याप्रथम जगाचा अनुभव घेत असतां स्वत:पासूनच विचाराचा आरंभ करील हें अगदीं उघड आहे. हा आरंभ करीत असतां त्यास काय आढळून येतें ? मनुष्याचा देह हें एक मोठें यंत्र असून तें अखंड चालू असतें. या देहरूपी यंत्रांत जगांतील बाह्य पदार्थांचें ज्ञान करून घेणारीं कांहीं साधनें असतात. तशींच देहाचे सर्व व्यवहार चालविणारीं दुसरीं कांहीं साधनें असतात. जगाचें ज्ञान करून देणारीं जीं साधनें आहेत त्यांना ज्ञानेंद्रियें असें म्हणतात. तीं नाक, कान, डोळे, जीभ व त्वचा अशीं पांच प्रकारचीं आहेत. नाकानें गंध, कानानें शब्द डोळयानें रूप, जिभेनें रस, व त्वचेनें स्पर्श समजतो. जगाचें ज्ञान करून घेण्याचीं हीं केवळ पांचच साधनें मनुष्याजवळ असल्यामुळें त्या साधनांच्या साह्यानें त्याला समजणारें जगही केवळ पांच प्रकारचेंच आहे असें तो समजतो. सर्वसामान्य मनुष्याला ज्ञानाचें सहावें साधन अथवा इंद्रिय उपलब्ध नसल्यामुळें त्याच्या प्रत्ययास येणारें जग पांच प्रकारचेंच रहातें. भौतिक शास्त्रांची पुष्कळ वाढ होऊन ज्ञानाचीं जीं विविध साधनें अस्तित्त्वांत आलीं त्यांनीं इंद्रियांच्या विविध शक्ति फक्त अधिक सूक्ष्म केल्या. पण त्यामुळें नव्याच एखाद्या ज्ञानसाधनाची कांहीं भर पडलेली नाहीं. असो. या ज्ञानेंद्रियांबरोबरच देहाचे व्यापार अथवा व्यवहार चालविण्यासाठीं पांच साधनें मनुष्याजवळ आहेत. तीं म्हणजे हात, पाय, वाणी, गुद आणि उपस्थ हीं होत. यांना पांच कर्मेंद्रियें म्हणतात. या पांच कर्मेंद्रियांच्या द्वारें आपण आपले सर्व व्यवहार करीत असतों. पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें मिळून होणारा जो इंद्रियांचा संघात अथवा समुदाय तो आपल्या शरीरांतील अत्यंत महत्त्वाचा भाग होय. पण एवढ्या भागानेंच आपलें सर्व काम संपतें असें मात्र नाहीं. कर्मेंद्रियें फक्त देहाचे व्यवहार चालवितात; व ज्ञानेंद्रियें आपापल्या विषयांचे संस्कार तेवढे उचलतात. पण या संस्कारांचें एकीकरण करून त्या सर्वांची

व्यवस्था लावण्याचें काम दुसऱ्या कोणाला तरी करावें लागतें. त्याशिवाय कोणत्याही संस्कारांचा कांहीं उपयोग होत नाहीं. उदा०, आपलें कर्णेंद्रिय निरनिराळे आलाप ऐकत असलें तरी त्या सर्व विविध आलापांतून अमक्या एका विशिष्ट रागाची ही तान आहे हें जें ज्ञान होतें तें स्वरांच्या नानात्वांतून येणाऱ्या एकत्वाच्या अनुभवानें होतें. हा अनुभव कोण घेतो ? डोळेरूपी ज्ञानेंद्रियाला मिनिट व सेकंद काटा फिरतांना दिसला तरी आकड्यांवरून फिरणाऱ्या त्या काट्यांच्या फिरण्यावरून व थांबण्यावरून किती वाजले याचा निर्णय कोण करतो ? ज्ञानेंद्रियें जागृत असतां त्यांचे विषय समोर असतांही त्या विषयाचें ज्ञान पुष्कळदां होत नाहीं असें अनुभवास येतें. असें कां? कांहींतरी निराळा असा पदार्थ मानवी देहांत असला पाहिजे कीं ज्याच्या भरंवशावर कर्मेंद्रियांना आपले व्यवहार करण्याची प्रेरणा मिळते, ज्ञानेंद्रियांच्या साधनांनीं होणाऱ्या संस्कारांचें एकीकरण होतें व व्यवस्था लागते. ती लावणाऱ्या साधनालाच मन असें म्हणतात. मनाला गीतेनें सहावें ज्ञानेंद्रिय मानलेलें आहे. तें कोणालाही दिसूं शकत नसल्यामुळें त्याला आंतलें ज्ञानसाधन अथवा अंतःकरण असें म्हणतात. मनाचे व्यापार विविध स्वरूपाचे असतात. ज्ञानेंद्रियांनीं बाहेरच्या पदार्थांचें ज्ञान घेऊन त्या ज्ञानाच्या संस्कारांची जुळवाजुळव व सुव्यवस्थित मांडणी करणें, नंतर त्यांच्या बऱ्यावाईटपणाचा विचार करून कोणती गोष्ट ग्राह्य व कोणती त्याज्य याचा निश्चय करणें व त्यानंतर ग्राह्य वस्तू घेण्याची व त्याज्य वस्तू टाकून देण्याची प्रवृत्ति होऊन तदनुरूप इन्द्रियांना प्रेरणा मिळणें हीं सारीं मनाचीं कामें होत. मनाच्या अथवा अंतःकरणाच्या या कार्यानुरूप त्याचे मुख्यतः दोन भाग पडतात. त्यांपैकीं एक भाग सारासार विवेक करून पदार्थांच्या स्वरूपासंबंधींचा अथवा ग्राह्याग्राह्यतेसंबंधींचा निश्चय करणारा असून दुसरा भाग इतर सर्व व्यापाराचा अथवा व्यवहाराचा होय. या पहिल्या निश्चयात्मक व्यापाराच्या भागाला बुद्धि असें म्हणतात. गीतेनें तिचें 'व्यवसायात्मिका बुद्धिः' असें वर्णन केलें आहे. ही सारासार विवेकशक्ति सोडून उर्वरित

जेवढे अंत:करणाचे व्यापार, ते करणाऱ्या भागास मन म्हणतात. मनाचे विविध स्वरूपाचे व्यापार असून त्या व्यापारांच्या अथवा वृत्तींच्या अनुरूप विविध स्वरूपाचे व्यवहार घडत असतात. हे व्यवहार करणें कर्मेंद्रियांचें व ज्ञान करून देणें हें जरी ज्ञानेंद्रियांचें काम असलें तरी मनाच्या प्रेरणेवांचून या दोन्ही इंद्रियसंघातांना कांहींच करतां येणें शक्य नसल्यामुळें या विविध इंद्रियराशीपेक्षां मन श्रेष्ठ आहे असा गीतेचा अभिप्राय आहे. पण कोणत्याही गोष्टीचा सारासार निश्चय झाल्याविना मनालाही प्रेरणा देणें अशक्य असल्यामुळें व त्या निश्चयासाठीं होणारे ज्ञानसंस्कार मन शेवटीं बुद्धीसमोरच मांडीत असल्यामुळें मनापेक्षांही बुद्धि श्रेष्ठ होय. श्रीमद्‌भगवद्‌गीता म्हणते :–

**'इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः।**
**मनसस्तु परा बुद्धिः'** ॥ –गीता, अ.३–४२

"बाह्य पदार्थांच्या मानानें इंद्रियें पलीकडचीं असून इंद्रिया-पेक्षां मन व मनापेक्षांही बुद्धि श्रेष्ठ होय." पण येवढ्यानें मनुष्य-देहाच्या अथवा पिण्डाच्या सर्व विशेषांचा उल्लेख पूर्ण होत नाहीं. पंचकर्मेंद्रियें, पंच ज्ञानेंद्रियें, मन व बुद्धि यांच्याशिवाय आणखी एक गोष्ट शरीरांत असते व ती गोष्ट म्हणजे स्पंदन किंवा जिवंतपणाचा व्यवहार होय. प्राणशक्तीची ही क्रिया अथवा जिवंतपणाची हालचालच नसेल तर बाकी सारें असूनही नसल्या-सारखेंच आहे. यालाच श्रीमद्‌भगवद्‌गीतेंत चेतना असें म्हटलें आहे. या चेतनेबरोबरच स्वतःची स्वतःला असलेली जाणीव व 'हें माझें आणि हें परक्याचें' असा भेद करण्याची असलेली शक्ति ही सर्व प्रवृत्तींचें मूळ असलेली दिसून येते. तिला अहंकार असें म्हणतात. आपलें स्थूल शरीर व इंद्रियें हीं पांचभौतिक असून हें सारें पांचभौतिक विश्व ज्या मूळ प्रकृतितत्त्वांतून विस्तारलें त्या प्रकृतितत्त्वांतूनच त्यांचाही विस्तार झालेला असल्यामुळें तें तत्त्व आपल्या देहांत अथवा पिण्डांत अनुस्यूत आहेच. हीं सर्व तत्त्वें ज्या शक्तीनें आपापल्या ठिकाणीं स्थिर राहतात ती शक्ति

अर्थातच या शरीरांतच राहते. तिला धृति असें म्हणतात या सर्वांना मिळून भगवद्‌गीतेनें क्षेत्र अथवा शेत असें नांव दिलें आहे. भगवान् म्हणतात :–

> **इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते । १**
> **महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**
> **इंद्रियाणि दशैकं च पंच चेन्द्रियगोचराः ।। ५**
> **इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।**
> **एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ।।६।।"** —गीता अ. १३

"हे कौंतेया ! या शरीरालाच क्षेत्र असें म्हणतात. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हीं पंच महाभूतें, अहंकार, बुद्धि, प्रकृति (अव्यक्त), दहा इंद्रियें, अंतःकरण (मन), पांच ज्ञानेन्द्रियांचे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच विषय, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात, चेतना आणि धृति या एकतीस तत्त्वांच्या समुदायाला सविकार क्षेत्र असें म्हणतात."

पण येथवर देहाचा अथवा पिण्डाचा जो विचार झाला तो केवळ एकांगी झाला व आजच्या भौतिक शास्त्रज्ञांनीं केवळ या एकांगी विचारावरच सारा भर दिला. हें क्षेत्र अथवा शेत, त्याची मर्यादा, विस्तार व खांचखळगे यांच्यासहित पाहिल्यावर महत्त्वाचा जो प्रश्न उरतो तो असा कीं, या क्षेत्राचा अथवा शेताचा धनी कोण ? कर्मेन्द्रियें व ज्ञानेन्द्रियें ज्याच्यासाठीं आपापलीं कामें करतात, मन ज्याच्यासाठीं जुळवाजुळव करतें व ज्याच्या प्रेरकतेनें प्रेरणा देतें, बुद्धि ज्याच्या सुखदुःखाच्या व इष्टानिष्टतेच्या केन्द्राभोंवतीं आपल्या निश्चयाचें जाळें विणते, ज्याच्यासाठीं चेतना चालू आहे तो या संघातावर अभिमान ठेवून राहणारा धनी कोण ? कारण तेवढाच एक पदार्थ कायतो चेतन असून बाकी सारे पदार्थ जड आहेत व चेतनाच्या इच्छाशक्तीनेंच जड पदार्थांचे व्यापार चालू असतात असा जगाचा अनुभव आहे. आपलें स्थूल शरीर व अवयवांचा संघात यांचा हे सर्व व्यापार करणें हा स्वभाव आहे असें म्हणून भागणार नाहीं. कारण

इच्छाशक्तीच्या - नियंत्रणावांचून व सुखदुःखाच्या आणि इष्टा-निष्टतेच्या प्रत्ययावांचून इतके सुव्यवस्थित व्यापार स्वभाव म्हणून होऊंच शकत नाहींत व आपला प्रत्यक्ष अनुभवही तसा नाहीं. शिवाय जड देहांतील प्राणांची हालचाल बंद पडली तर अवयवांचा संघात असूनही देह नुसताच पडलेला असतो. तो कांहींही करूं शकत नाहीं. यावरून हेंच स्पष्ट होतें कीं देह व त्याचा अवयवसंघात हे आपल्या स्वभावानुरूप कांहींच करीत नसून कोणाच्या तरी इच्छाशक्तीच्या नियंत्रणानुरूप व इच्छापूर्तीस्तव केवळ साधन म्हणून त्यांचा वापर चालू असून तो वापर करणारा कोणी तरी वेगळाच आहे. शिवाय अलीकडच्या शास्त्राप्रमाणें आपल्या शरीरांतील सर्व घटकावयव कणशः रोज जुने संपून नवे येत असतात. अशा स्थितींत शरीरांतील प्रत्येक कण बदलत असतां त्या नानात्वांतून एकत्वाची अखंड प्रतीति शेवटपर्यंत असते हें आपण पाहतों. नुसत्या जड देहाला व अवयवसंघातांना ही प्रतीति येणें शक्य नाहीं. कारण तें नुसतें प्रतिक्षणीं बदलणारें नानात्व आहे. त्या बदलत्या नानात्वांतून सदैव अनुस्यूत असलेला, बदलत्या नानात्वानें ज्याच्यावर कांहींही परिणाम होऊं शकत नाहीं असा कोणीतरी एक व अविकारी असला पाहिजे हें उघडच आहे. ती अविकारी गोष्ट म्हणजे प्राणशक्ति असेंही म्हणतां येत नाहीं. कारण गाढ निद्रेंत प्राणशक्तीचें रुधिराभिसरण, श्वासोच्छ्वास इत्यादि व्यापार चालू असतात तरी सुद्धां त्या अवस्थेंत स्वतःचें स्वतःला ज्ञान व भान नसतें. याचा अर्थ काय? याचा अर्थ असाच नाहीं काय कीं, प्राणशक्तीहूनही वेगळी व मी या अहंभावानें अथवा खरें म्हटलें तर अहंप्रत्ययानें अनुभवास येणारी अशी, या देहरूपी अथवा इंद्रियसंघातरूपी शेताचा धनी असणारी कोणतीतरी याहून पूर्णपणें वेगळी वस्तू आहे. संपूर्ण जगा-वरचा अभिप्राय ज्याच्या भरंवशावर आपण देत असतों, जीवनाचे सारे व्यवहार व व्यापार ज्याच्या अस्तित्वाच्या भरंवशावर सर्वत्र चाललेले असतात, व ज्याच्या अस्तित्वाच्या प्रतीतीनें सारा जीवनमार्ग उजळतो त्यालाच नाकारावयाचें याच्याइतका मूर्खपणा

दुसरा कोणता असूं शकेल ? कांहीं लोकांचें म्हणणें असें असें आहे कीं, हा चेतन दुसरा तिसरा कोणी नसून गीतेंत ज्याला क्षेत्र म्हटलें आहे त्याच्या समुच्चयासच चेतन नांवाचा गुणधर्म उत्पन्न होतो. पण नुसत्या समुच्चयामुळें कर्तृत्व कधींहि उत्पन्न होत नाहीं. क्षेत्राचे सर्व व्यवहार ज्या अर्थी कोणाच्या तरी फायद्यासाठीं केले जातात व ते व्यवस्थितपणें होतात त्या अर्थी त्याची प्रेरकशक्ति स्वतंत्रच असली पाहिजे. ती ज्ञेय या कक्षेंत येऊं शकत नाहीं म्हणून ती वस्तूच नाहीं असें म्हणतां येत नाहीं. जो सर्वांना जाणणारा, त्याला जाणण्याचा प्रकार इतर ज्ञेय पदार्थासारखाच असला पाहिजे या विलक्षण हटवादांत कांहीं अर्थ नाहीं. सर्वांना जाणण्याचीं साधनें जीं इंद्रियें तीं बहिर्मुख असल्यामुळें तीं त्याच पद्धतीनें अंतरात्म्याला जाणूं शकत नाहींत असें उपनिषदांनीं म्हटलें आहे. "परांचि खानि व्यतृणत् स्वयंभूः तस्मात् पराङ पश्यति नान्तरात्मन्।" सृष्टिकर्त्यानें सर्व इंद्रियें बहिर्मुख केलेलीं असल्यामुळें इंद्रियें हीं फक्त बाह्य पदार्थाला ज्याप्रमाणें जाणूं शकतात त्याप्रमाणें तीं अंतरात्म्याला जाणूं शकत नाहींत. जगांतील प्रत्येक पदार्थ 'ज्ञेय' या एकाच कोटींत आला पाहिजे, हा तरी आग्रह व्यर्थच नाहीं काय? काय वाटेल तें झालें तरी ज्ञाता ज्ञेय कसा होणार ? त्याच्या ज्ञानाचा क्रम अर्थातच भिन्न राहणार ! "प्यारे उलट कमल मो पलट देख ले मौजा, घटमो राम बिराजा।" हे संत कवींनीं त्याच्या ज्ञानाचें रहस्य स्पष्ट केलें आहे. 'विज्ञातारमरे केन विजानीयात्' जाणणाऱ्यालाच कोण जाणील ? असें बृहदारण्यकोपनिषदांतहि विचारलें आहे. सर्व भौतिक शास्त्रज्ञांच्या समोर आ वासून पडलेला, ज्याच्या अस्तित्वाची त्यांना पूर्ण प्रतीति आहे, पण ज्याचा विचार न केल्यामुळें साऱ्या भौतिक संस्कृतींत व सुधारणेंतच एकांगी अपुरेपणा भरलेला आहे, त्या या महान् शक्तीला स्वतंत्र मानण्याची आवश्यकता आतां सर्वांसच पटूं लागली आहे. मनबुद्धीसहित सर्व क्षेत्राच्या सर्व व्यापारांचें नियंत्रण करणारी, एकीकरण करणारी त्यांना कर्मप्रेरणा देणारी व त्यांच्या कर्माला साक्षीभूत असणारी जी ही महान् शक्ति तिलाच आत्मा असें म्हणून 'यो बुद्धेः परतस्तु सः'

असा गीताकरांनीं तिचा निर्देश केलेला आहे. अलीकडचे पाश्चात्य तत्त्वज्ञ देखील आत्म्याच्या या इच्छाशक्तीनेंच मेंदू, बुद्धि, मन हे सर्व पदार्थ नुसते व्यापारंच करीत नसून उत्पन्नहि होतात असें मानूं लागले आहेत हें कम्युनिझमच्या तत्त्वज्ञानाचें परीक्षण करतांना मी दाखवून दिलें आहे. सर्व शरीरांत अथवा पिंडांत मूलतत्त्व केवळ हें आत्मतत्त्वच असून त्याच्या केवळ संकल्पशक्तीनें या सर्व पिंडाची रचना व निर्मिति झाली असून विकारी पिंडांत ते एक अविकारी, बदलत्या पिंडांत तें एक न बदलणारें, प्रतिक्षणीं नाश पावणाऱ्या पिंडांत तें एक न नाश पावणारें आहे व पिंडाचें खरें तत्त्व तेंच होय हें स्पष्ट होतें. म्हणून भगवंतांनीं श्रीमद्भगवद्गीतेंत त्या तत्त्वालाच क्षेत्रज्ञ व स्वतःचा अंश असें म्हटलें आहे. श्री भगवान् म्हणतात:

**" इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ।**
**एतद् यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १**
**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ "**

—गीता अ. १३

"हे कौन्तेया, या शरीरासच क्षेत्र असें म्हटलें आहे. हें शरीर जो जाणतो त्यास क्षेत्रज्ञ असें या शास्त्रांतील ज्ञाते पुरुष म्हणतात. सर्व शरीरांतील क्षेत्रज्ञ म्हणजे मीच होय." आणि क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें जें ज्ञान तेंच माझें म्हणजे परमेश्वराचें ज्ञान होय. याप्रमाणें मूलभूत अशा प्रत्यक्ष प्रत्ययास येणाऱ्या अस्मितेच्या स्वरूपाचा गीताकारांनीं उलगडा केलेला आहे. यालाच क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार असें म्हणतात. पण केवळ क्षेत्रक्षेत्रज्ञविचारानें सर्व विचार संपत नाहीं. मी कोण याचा उलगडा यानें झाला असला तरी हें जग काय आहे, त्याचें मूलतत्त्व कोणतें, व त्याचा आणि माझा संबंध काय ? हें समजावून घेणें व याचा उलगडा करणें शिल्लक उरतेंच. पिंडाचा विचार झाल्यावर उरणारा ब्रह्मांडाचा विचार शिल्लक उरतो. गीताकारांनीं त्याचा उलगडा पुढीलप्रमाणें केला आहे:—

## गीताकारांचा विश्वाचा उलगडा

या दृश्य जगाचा उलगडा करणारीं अनेक शास्त्रें हल्लीं अस्तित्वांत असून प्राचीन भारतीय दर्शनांपैकीं वैशेषिक व सांख्य या दोन दर्शनांनीं या विषयाचा सखोल विचार केलेला आहे. आपल्या ज्ञानेन्द्रियांनीं प्रत्ययाला येणारे हे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंधात्मक विश्व नित्य बदलणारे व सृजनशील वाटत असलें तरी विश्वांत अजिबात नवें असें कांहींच उत्पन्न होत नाहीं असा भारतीय तत्त्वज्ञानाचा सिद्धांत असून गीताकारांनीं तोच पुढीलप्रमाणें सांगितला आहे.

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥** –गीता अ. २–१६

"जें नाहीं तें आहेसें होत नाहीं व जें आहे तें नाहींसें होत नाहीं. तत्त्वज्ञानी पुरुषांनीं सत् व असत् यांचा शेवट पाहून हा स्वरूपनिर्णय केलेला आहे. उत्पन्न झालेल्या पदार्थांत अथवा कार्यांत जे विशेष दृष्टोत्पत्तीस येतात ते त्याच्या मूळकारणांत बीजरूपानें असतातच. यालाच सत्कार्यवाद म्हणत असतात. दृश्यसृष्टीच्या अथवा विश्वाच्या संबंधींचा गीतेचा हा सिद्धांत अलीकडच्या विज्ञानशास्त्रज्ञांनाही मान्य असून वस्तूचीं कितीही रूपांतरें झालीं तरी तिच्यांतील जडद्रव्यें व कर्मशक्ति ही कायमच असतात असें त्यांचें म्हणणें आहे. दृश्य विश्वासंबंधींचा गीतेचा हा दृष्टिकोन शून्यवादी बौद्ध व हल्लींचें Negation of negation चा पुरस्कार करणारे साम्यवादी यांच्याहून वेगळा आहे. जें नाहीं त्यापासून दुसरें उत्पन्न होणारच कसें ? बीजापासून अंकुराची व अंकुरापासून झाडाची उत्पत्ति होते हें आपण पाहतों. शून्यवादी बौद्ध, कणाद, व Negation of negation चा पुरस्कार करणारे लोकही असें प्रतिपादन करीत असतात कीं बीजापासून अंकुराची व अंकुरापासून झाडाची उत्पत्ति होत नसून बीजाच्या विनाशांतून झाड उत्पन्न होतें. पण हें प्रतिपादन चुकीचें आहे. कारण हव्या त्या बीजापासून वाटेल तो अंकुर वा झाड उत्पन्न होत नाहीं. वडाच्या बीजांतून आंब्याचें

झाड उत्पन्न होतें काय? विशिष्ट बीजापासून विशिष्टच झाड उत्पन्न होतें. सृष्टींतील इतर पदार्थांचेंहि असेंच आहे. वाळूपासून कधीं तेल निघत नाहीं व पाण्याचें कधीं दही होत नाहीं. बीजांतील द्रव्यांनीं अंकुराचा नवा आकार घेतला येवढाच खरा अर्थ आहे. असो. सत्कार्यवादाच्या या सिद्धांतानुरूप सृष्टि अथवा प्रत्ययास येणारें हें विश्व कोणत्या तरी कारणापासून उत्पन्न झालेलें असून तें कारण अथवा विश्व उत्पन्न करणारा तो पदार्थ विश्वाच्या ठिकाणीं जे विशेष अथवा गुण दृष्टोत्पत्तीस येतात त्या गुणांनीं युक्त असला पाहिजे. सृष्टींत जरी नानाविध पदार्थ व त्यांचे नाना प्रकारचे रंगरूप दृष्टीस पडत असले तरी सृष्टीचें कारण अथवा मुळांत सर्व वस्तूंतील द्रव्य एकच असलें पाहिजे असें भारतीय तत्त्वज्ञानाचें म्हणणें असून आजच्या विज्ञानालाही सृष्टीचें आधारभूत द्रव्य एकच आहे हें मान्य आहे. वैज्ञानिक या द्रव्याला Matter म्हणून संबोधितात तर भारतीय दार्शनिकांपैकीं सांख्यशास्त्रज्ञ या मूलभूत द्रव्याला 'प्रकृति' अथवा 'प्रधान' अशी संज्ञा देतात. प्रकृति म्हणजे मूळचें व प्रधान म्हणजे खरें महत्त्वाचें अथवा मुख्य. या मूलद्रव्यापासून सर्व विश्व उत्पन्न झालेलें असल्यामुळें अर्थातच विश्व हें त्या प्रकृतीची विकृति अथवा मूलभूत द्रव्याचा विकार होय. प्रकृति हें जगाचें मूलकारण असून तीच जगद्रूपानें परिणाम पावली असें गीताकारांचेंहि प्रतिपादन आहे. हें मूलभूत द्रव्य जरी एकच असलें तरी तें एकाच विशेषाचें अथवा गुणाचें नाहीं व असणें शक्यही नाहीं. कारण एकाच गुणाच्या द्रव्यापासून अनेक गुणांनीं अथवा वैशिष्ट्यांनीं युक्त असें विश्व कसें उत्पन्न होणार? कारण सत्कार्यवादाच्या सिद्धांताप्रमाणें कार्याचे गुण बीजरूपानें कारणांत असल्यावांचून तें कार्यांत परिणमित होऊंच शकणार नाहींत. या मूलभूत द्रव्याचें गुणविशेष कार्याच्या गुणविशेषावरूनच ठरवावे लागतील. विश्वरूपी कार्याचे गुणविशेष काय आहेत? अनंत गुणांनीं युक्त असलेल्या या विश्वाच्या सर्व गुणांचें सूक्ष्म परीक्षण केलें तर असें आढळून येईल कीं यच्चयावत् पदार्थांच्या तीन अवस्था असतात. कोणताही

पदार्थ घेतला तरी त्याची शुद्ध किंवा पूर्णावस्था, तद्विरुद्ध टोंकाची आत्यंतिक निकृष्टावस्था व निकृष्टावस्थेंतून पूर्णावस्थेकडे विकसन पावण्याची अथवा पूर्णावस्थेंतून निकृष्टावस्थेकडे येण्याची, विकसनोन्मुख अथवा पतनोन्मुख प्रवृत्ति या त्या तीन अवस्था होत. या तीन अवस्थांच्या, गुणांच्या अथवा विशेषांच्या कक्षेंत न येणारा एकही पदार्थ नसून साऱ्या नाना गुणांचा या तीन विशेषांत अंतर्भाव होतो. यांनाच सत्त्व, रज व तम असें म्हणतात. यांपैकीं शुद्धावस्थेला सत्त्व, निकृष्टावस्थेला तम व प्रवर्तकावस्थेला रज असें म्हणतात. गीताकारांनीं या त्रिगुणांच्या सर्वंकष व्याप्तीसंबंधीं असें म्हटलें आहे कीं:–

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात् त्रिभिर्गुणैः॥** –गीता अ. १८–४०

"या पृथ्वीवर, आकाशांत किंवा देवलोकींही असें कांहीं नाहीं कीं जें प्रकृतीच्या या तीन गुणांपासून मुक्त म्हणजे सुटलेलें आहे." सृष्टीचें अथवा विश्वाचें मूलभूत द्रव्य जी प्रकृति ती या तीन गुणांनीं युक्त असून त्या त्रिगुणमयी प्रकृतींतूनच हें त्रिगुणात्मक विश्व उत्पन्न झालेलें आहे. हे तीन गुण म्हणजेच प्रकृति होय. अगदीं प्रारंभींच्या अवस्थेंत या तीन गुणांपैकीं प्रत्येकाचा जोर सारखाच असल्यामुळें प्रकृतीला अथवा मूलभूत द्रव्याला त्रिगुणांची साम्यावस्था असें म्हटलें आहे. ही साम्यावस्था मोडणें म्हणजे वैषम्यमय विश्वाची निर्मिति होय. विश्व आपल्या मूलभूत अवस्थेंत जेव्हां विलीन होईल म्हणजेच विश्व विश्वरूपानें नष्ट होईल तेव्हां त्रिगुणांची ही साम्यावस्था पुन्हां येईल. साम्यावस्थेंत सृजन, स्पंदन, हालचाल कांहीं नाहीं. पण या साम्यावस्थेंत वैषम्य उत्पन्न झालें कीं रजोगुणाच्या सामर्थ्यानें मूळ प्रकृतिपासून निरनिराळें सृजन होऊं लागतें व नानात्वानें नटलेलें विश्व उत्पन्न होतें. जगांतील यच्चयावत् सर्व पदार्थांत सत्त्व, रज आणि तम या तिहींचेंहि मिश्रण आहे. हें मिश्रण नेहमी तिहींच्या अन्योन्य कमीजास्त प्रमाणानें होत असल्यामुळें मूळ द्रव्य एक असलें तरी

गुणभेदानें एका मूळ द्रव्याचेच मनुष्यशरीर, धातू, पाषाण इत्यादि विकार होत असतात. ज्याला आपण सात्त्विक गुणाचा पदार्थ म्हणतो त्यांत रज आणि तम या दोन गुणांपेक्षां सत्त्वाचा जोर अथवा प्रमाण अधिक असल्यामुळें त्यांत नेहमी असणारे रज आणि तम दबले जाऊन आपल्या दृष्टीस पडत नाहींत इतकेंच. वास्तविक सत्त्व, रज, आणि तम हे तिन्ही गुण इतर पदार्थांप्रमाणेंच सात्त्विक पदार्थांतहि आहेत. निव्वळ सत्त्वगुणी, निव्वळ रजोगुणी अथवा निव्वळ तमोगुणी असा पदार्थच नाहीं. प्रत्येक पदार्थांत तिन्ही गुणांचें आंदोलन चालू असतें. आणि त्यांत जो प्रबल होतो त्याप्रमाणें सात्त्विक, राजस व तामस हा शब्दव्यवहार आपण करतों. मूळ एकच असलेल्या प्रकृतिरूप द्रव्यापासून हें विश्वरूप नानात्व कसें उत्पन्न झालें याचा हा जो विचार त्यालाच विज्ञान असें म्हणतात. आजच्या सर्व भौतिक शास्त्रांचा या विज्ञानांतच समावेश होतो. विश्व व त्याचें हें जें प्रकृतिरूप कारण यांच्यांत प्रथमदर्शनीच एक महत्त्वाचा भेद असल्याचें प्रत्ययास येतें. तो हा कीं नानात्वानें नटलेलें हे शब्दस्पर्शरूपरसगंधात्मक विश्व आपल्या इंद्रियांनीं आपल्यास पाहतां व अनुभवितां येतें. जे पदार्थ इंद्रियांच्या मर्यादित शक्तीनें पाहतां येत नाहींत त्यांचा प्रत्यय घेण्याचीं उपकरणेंहि आजच्या विज्ञानानें आपणांस उपलब्ध करून दिलेलीं आहेत. शरीराच्या आंतील हाडें, फुफुसें, मनुष्य जिवंत असतां आपल्या डोळ्यांनीं पाहतां येत नसलीं तरी 'क्ष' किरणांनीं छायाचित्र काढून तीं पाहतां येतात. म्हणून गीताकारांनीं विश्वाला 'व्यक्त' असें म्हटलें आहे. पण विश्व पाहतां आलें तरी त्याचें आधारभूत हें प्रकृतिरूपी मूलद्रव्य मात्र पाहतां येत नाहीं. आजच्या विज्ञानालासुद्धां गतिस्वरूप विद्युत्परमाणूंच्या अखंड प्रचंड गतीमुळें सतत आन्दोळलें जाणारें हें मूलद्रव्य केवळ अनुमानितां येतें; त्याचा प्रत्यय घेतां येत नाहीं. म्हणून प्रकृतीला गीताकारांनीं 'अव्यक्त' असें म्हटलें आहे. अखंड एकजिनसी प्रकृति ही अव्यक्त असून विश्व हें व्यक्त आहे. ज्याचा इंद्रियांनीं प्रत्यय घेतां येत नाहीं तें अव्यक्त व ज्याचा प्रत्यय घेतां येतो तें व्यक्त होय.

विश्वाचें वर्णन करतांना गीताकारांनीं त्याला व्यक्तमध्य म्हटलें आहे. ते म्हणतातः—

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥** —गीता अ. २–२८

"मूळ एका अव्यक्त द्रव्यापासूनच क्रमाक्रमानें सर्व व्यक्त सृष्टि निर्माण होऊन शेवटीं म्हणजे प्रलयकालीं सर्व व्यक्त सृष्टीचा पुन्हां अव्यक्तांतच लय होतो. म्हणजे विश्वाचें आदि व अंत अव्यक्त असून मध्य फक्त व्यक्त आहे." यावरून विश्व व त्याचें मूलतत्त्व यांच्यासंबंधींचा गीताकारांचा आणखी एक अभिप्राय स्पष्ट होतो. तो हा कीं त्रिगुणात्मक प्रकृति ही अव्यक्त व चोहोंकडे निरंतर भरून राहिलेली असून तीच व्यक्त सृष्टीच्या आदि-अंतीं असल्या-मुळें व्यक्त सृष्टीच्या मानानें 'अक्षर' म्हणजे न क्षरणारी—अविनाशी आहे, तर व्यक्त सृष्टि अव्यक्तांतून निघून पुन्हां अव्यक्तांतच विलय पावणारी असल्यामुळें व मध्यंतरींच केवळ तिचें प्रत्ययास येणें व तेंहि प्रतिक्षणीं नवेंनवें स्वरूप घेऊन नामरूपात्मक बदलानें प्रत्ययास येणें असल्यामुळें अर्थातच ती 'क्षर' म्हणजे क्षरणारी, बदलणारी आहे. गीताकारांचा विश्वाचा हा उलगडा ध्यानांत घेतला तर मागें ज्याला क्षेत्र म्हटलें तें पिंडाचे सर्व घटक या व्यक्तमध्य क्षर सृष्टींतच अंतर्भूत होतात हें दिसून येईल. या व्यक्तमध्य सृष्टीचा अव्यक्तांतून उदय पावण्याचा व पुन्हां अव्यक्तांतच विलय पावण्याचा कारखाना सदैव कसा चालू असतो हें गीताकारांनीं ब्रह्मदेवाच्या दिवसरात्रीच्या पौराणिक कल्पनेच्या साहाय्यानें पुढीलप्रमाणें उलगडून दाखविलें आहेः—

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८**
**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥१९**

**—भगवद्‌गीता, अ. ८**

"हा ब्रह्मदेवाचा दिवस सुरू झाला म्हणजे अव्यक्तापासून सर्व व्यक्त पदार्थ निर्माण होतात आणि रात्र सुरू झाली म्हणजे त्याच पूर्वोक्त अव्यक्तांत लय पावतात. भूतांचा तोच हा समुदाय याप्रमाणें पुनःपुन्हां जन्मून अवश होत्साता, म्हणजे स्वतः इच्छा असो वा नसो, रात्र सुरू झाली कीं लय पावतो आणि दिवस सुरू झाला कीं जन्मतो." असो. याप्रमाणें सर्व विश्व हें क्षराक्षरात्मक व व्यक्ताव्यक्तस्वरूप असून त्याच्यांतच क्षेत्ररूपी पिण्डाचाहि समावेश होतो. पण क्षेत्रक्षेत्रज्ञविचारांत उल्लेखिल्याप्रमाणें या जडप्रकृतीपासून जीव कांहीं उत्पन्न होऊं शकत नाहीं. आजच्या विज्ञानवेत्त्यांनाही हें मान्यच करावें लागतें. मग दुराग्रही स्टॅलिन-वादी कांहींही म्हणोत. प्रकृतीचा व तिच्या विकारांचा प्रत्यय घेणारा प्रकृतीपेक्षां वेगळा असल्याविना 'मी जाणतों, मी उपभोग घेतों' ही भाषाच प्रचारांत येऊं शकत नाहीं. व्यवहार पाहिला तरी आपण जें जाणतों व पाहतों तें आपल्याहून वेगळें असल्याचा अनुभव सर्वांसच आहे. म्हणून ज्ञाता व ज्ञेय अथवा जडप्रकृति व तिचा उपभोक्ता हे दोन भिन्न पदार्थ आहेत हें मानणें भाग पडतें. या जाणणाऱ्यालाच गीताकारांनीं पिण्डविचारांत क्षेत्रज्ञ व ब्रह्मांडविचारांत पुरुष असें म्हटलें असून प्रकृतीप्रमाणेंच तें एक स्वतंत्र व अनादिसिद्ध तत्त्व मानलें आहे. प्रकृति व पुरुष हें द्वंद्व विश्वाच्या या उलगड्यांत प्रत्ययास येत असून जडचैतन्याचा हा द्वंद्वात्मक प्रवाह अनादिसिद्ध आहे. या द्वंद्वाचें स्वरूप व त्याचें कार्य सांगतांना गीताकार म्हणतातः—

> प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।
> विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसम्भवान् ॥ १९
> कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
> पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥२०

—गीता अ. १३

"प्रकृति व पुरुष हीं दोन्हीही अनादि आहेत असें समज. विकार व गुण हे सर्व प्रकृतीपासून उद्भवतात असें समज. कार्य

म्हणजे देह व करण म्हणजे इंद्रियें यांच्या कर्तृत्वास प्रकृति कारण आहे आणि कर्ता नसूनही सुखदुःखाचा उपभोग घेण्यास पुरुष कारण आहे." विश्वाच्या मुळाशीं प्रकृति-पुरुषाचें हें द्वंद्व अनादिसिद्ध आहे असें म्हणणारे गीताकार द्वंद्ववादी अथवा द्वैती आहेत काय? नाहीं. गीताकार पूर्णपणें अद्वैती आहेत. या अनादिसिद्ध द्वंदापलीकडे आणखी एक तत्त्व असून त्या चैतन्यतत्त्वाचा विलास म्हणजेच हें द्वंद्व व त्यापासून निघणारा विश्वाचा पसारा होय असें त्यांचें प्रतिपादन आहे.

विश्वाचें मूलघटक द्रव्य असलेली ही त्रिगुणमयी प्रकृति साम्यावस्थेंत असतां तिच्यांत कमीजास्तपणाचें हें वैषम्य कसें निर्माण होतें व तें कोण निर्माण करतें ? प्रकृति जर जड आहे तर कोणी तरी चेतनानें आपल्या इच्छाशक्तीनेंच तिच्याकडून हें कार्य घडविणें आवश्यक आहे. प्रकृति ही सारा विश्वसंसार उभारीत असली व चालवीत असली तरी ती जड असल्यामुळें आपला संसार चालविण्यास व उभारण्यास ती स्वतंत्र असूं शकत नाहीं. जर नानात्वाचें मूळ प्रकृतिद्रव्याच्या एकत्वांत पाहण्याची ही पद्धति युक्तिसिद्ध व शास्त्रीय आहे तर ती या द्वंद्वापर्यंत येऊन थांबणें अर्थातच अशास्त्रीय ठरतें. ती शेवटपर्यंत चालवावयाची म्हणजे या पुरुषप्रकृतिरूप द्वंद्वाचाही अंतर्भाव कोठें तरी एकत्वांत होणेंच आवश्यक आहे. भारतीय दार्शनिकांपैकीं सांख्य हे द्वंद्ववादी असून प्रकृति व पुरुष हे दोन्ही स्वतंत्र आहेत व प्रकृति पुरुषाच्या लाभासाठींच हा विश्वपसारा मांडते असें मानतात. पण स्वतंत्र पुरुषाचा स्वतंत्र प्रकृतीशीं हा जो संयोग झाला तो खरा आहे कीं खोटा आहे? खरा मानला तर तो केव्हांही सुटणें शक्य नसल्यामुळें आत्म्याला मुक्ति कधींच प्राप्त होऊं शकत नाहीं व खोटा असेल तर प्रकृति पुरुषाच्या फायद्यासाठीं प्रवृत्त होते हें म्हणणें निर्मूल ठरतें. ज्याप्रमाणें मातीपासून बनणाऱ्या पदार्थांत सर्वत्र माती अनुस्यूत असल्यामुळें तिलाच त्या पदार्थांचें मूलकारण म्हणतां येतें त्याप्रमाणें जगांतील प्रत्येक पदार्थ सत्त्वरजस्तमात्मक असल्यामुळें सर्व पदार्थांचें मूळ प्रकृतितत्त्वच आहे. हें जसें व्यावहारिक

सिद्धान्ताच्या साहाय्यानें सिद्ध करतां येतें तसेंच चेतनानें प्रेरणा दिल्यावांचून स्वतंत्रपणें जडपदार्थ कोणत्याही लाभालाभासाठीं प्रवृत्तच होऊ शकत नसल्यामुळें त्या प्रकृतीचा कोणीतरी चेतन अधिष्ठाता मानणें क्रमप्राप्त आहे. गाय जशी वासरासाठीं दूध देते तशी प्रकृति पुरुषाच्या लाभासाठीं प्रवृत्त होते हें म्हणणेंही बरोबर नाहीं. कारण गाईच्या पोटींच वासरूं झालें असल्यामुळें वासरावर गाईचें असलेलें प्रेम जसें स्वाभाविक ठरतें तसें प्रकृतीचें पुरुषावर असलेलें प्रेम सिद्ध करण्याची कांहींएक उपपत्ति लागू शकत नाहीं. सृष्टीचा सर्व व्यवहार पाहिला तर तो अत्यंत सुव्यवस्थित रचनाबद्ध व कार्यकारणभावसंपन्न असल्याचें आढळून येईल. ही सुव्यवस्थित रचना चेतनाच्या इच्छाशक्तीवांचून झाल्याचें कधींही आढळून येत नाहीं. हें एखाद्याच्या साध्या संसाराचें निरीक्षण केलें तरी ध्यानांत येतें. मातीपासून निरनिराळे पदार्थ तयार होतात हें खरें आहे; पण मातीला कुंभाराचे हात लागल्याखेरीज तिच्यांतून कोणताही पदार्थ कधींच होत नाहीं. गवताचें परिणमन दुधांत होतें. तसेंच जड प्रकृतीचें परिणमन विश्वांत कां होऊं नये हा सुद्धां प्रश्न निर्मूल आहे. गवत वाटेल तेथें टाकलें तर त्याचें दूध होत नाहीं. गायरूपी चेतन पदार्थाच्या पोटांत तें गेलें तरच त्याचें दूध होत असतें. म्हणून गीताकार प्रकृति आणि पुरुष यांचें द्वंद्व मानीत असले तरी त्या दोहोंच्याही पलीकडे तिसरें सर्वव्यापक, अव्यक्त व अमृत तत्त्व सर्व सृष्टीच्या मुळाशीं असून त्याच्या इच्छाशक्तीनेंच जड प्रकृति कार्यप्रवण होते व व्यवहार करते. ही त्रिगुणात्मिका प्रकृति सगुण असल्यामुळें जें जें सगुण असतें तें तें नाशवंत असतें म्हणून प्रकृतीचेंही मूळ असलेलें हें अव्यक्त तत्त्व प्रकृतीचा नाश झाल्यावरही टिकून राहतें; व तेंच सृष्टीचें खरें व नित्य तत्त्व होय. गीताकार म्हणतातः—

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥** —गीता अ. ८–२०

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥** —गीता. अ. १५–१६

उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ।। –गीता अ. १५–१७
यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
ततोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ।।– गीता अ. १५–१८

या अव्यक्तापलीकडचा दुसरा सनातन अव्यक्त पदार्थ सर्व भूतें नष्ट झालीं तरी नष्ट होत नाहीं. या लोकांत क्षर आणि अक्षर हे दोन पुरुष आहेत. क्षर म्हणजे सर्व नाशिवंत भूतें आणि कूटस्थ म्हणजे या सर्व भूतांच्या मुळाशीं असणारें प्रकृतिरूप अव्यक्त तत्त्व. त्याला अक्षर असें म्हणतात. परंतु जो पुरुषोत्तम तो या दोहोंहून भिन्न आहे. त्याला परमात्मा असें म्हणतात. तोच अव्यय ईश्वर सर्व त्रैलोक्यांत भरलेला असून सर्वांचें पोषण करतो. ज्या अर्थी मी क्षराच्याही पलीकडचा व अक्षराहूनही उत्तम पुरुष आहें त्या अर्थी लोकव्यवहारांत आणि वेदांमध्येंही पुरुषोत्तम या नांवानें मी प्रसिद्ध आहें." प्रकृतिपुरुषांच्या द्वंद्वा-पलीकडचें हें जें परमेश्वरी तत्त्व अथवा चैतन्य त्यालाच परब्रह्म असें म्हणत असून सगुण साकार रूपानें श्रीकृष्ण म्हणजे तें परब्रह्मच होय. म्हणून भगवद्गीतेंत परब्रह्माचा निर्देश 'मी' अशा शब्दांनीं भगवंतांनीं केला आहे. या परब्रह्माची इच्छाशक्ति जगाच्या निर्मितीसाठीं प्रकृतीला प्रेरणा देते व तिच्याकडून जगद्रूपी सर्व कार्य घडविते. प्रकृति हें साधन असलें तर परमेश्वर त्याचा वापर करून विश्वरूपी कार्य घडवितो. भगवद्गीतेंत स्वतः भगवान् असें म्हणतात कीं,–

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ।। –अ.४–६
प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनःपुनः ।
भूतग्राममिमं कृत्स्नं अवशं प्रकृतेर्वशात् ।। –अ. ९–८
मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।,
हेतुनाऽनेन कौन्तेय जगद् विपरिवर्तते ।। –अ. ९–१०
मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।
सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत ।। –अ. १४–३

**सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः सम्भवन्ति याः ।**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥** –अ. १४–४

"मी सर्व भूतांचा धनी व जन्मविरहित असून माझें आत्मस्वरूप जरी कधींही व्यय म्हणजे विकार पावत नाहीं तरी माझ्याच प्रकृतीच्या ठायीं अधिष्ठित होऊन मी आपल्या मायेनें जन्म घेत असतों. प्रकृतीलाच गीताकार माया असा शब्द वापरतात. ती परमेश्वराची अचिंत्य शक्ति होय. तिला स्वतंत्र अस्तित्व नाहीं असें त्यांचें मत आहे. "मी आपल्या प्रकृतीला हातीं धरून त्या प्रकृतीच्या स्वाधीन झाल्यानें अवश म्हणजे परतंत्र अर्थात् ज्याच्या त्याच्या कर्मानें बद्ध झालेला हा भूतांचा सर्व समुदाय पुनःपुन्हा निर्माण करतों. मी अध्यक्ष होऊन पृथ्वीकडून सर्व चराचर सृष्टि प्रसवितों. या कारणामुळें, हे कौंतेया, जगाची ही घडामोड चाल-लेली आहे. हे भारता, महद्ब्रह्म म्हणजे प्रकृति ही माझीच योनि असून मी त्या ठिकाणीं गर्भ ठेवितों. नंतर त्यापासून सर्व भूतें उत्पन्न होऊं लागतात. पशुपक्ष्यादि सर्व योनींत ज्या ज्या मूर्ति जन्मास येतात त्यांची त्यांची, हे कौंतेया, प्रकृति ही योनि असून मी बीजदाता पिता आहें." या सर्व जगाचा मी पिता आहे हें श्रीभगवंतांनीं वारंवार सांगितलें आहे. तात्पर्य, विश्वरूपी पसाऱ्याचें मूल कारण असलेली ही प्रकृति म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून परमेश्वराची अचिंत्य अशी मायाशक्तिच आहे व परमेश्वरच अथवा चैतन्यतत्त्व हेंच सृष्टीचें खरें मूलकारण असून त्याच्या इच्छाशक्तीनेंच सारें जग झालें असें गीताकारांनीं सांगितलें आहे. सर्व सृष्टीच्या मुळाशीं असलेल्या मूलद्रव्याच्या पाठीशीं स्वतंत्र इच्छाशक्तीची प्रेरणा असावी असें आजच्या विज्ञान-शास्त्रज्ञांनाही वाटूं लागलें आहे. क्षेत्रज्ञ अथवा जीव, जगत् व परब्रह्म यांचा याप्रमाणें उलगडा केल्यावर प्रश्न असा शिल्लक उरतो कीं, देहरूपी क्षेत्रांत राहणाऱ्या या क्षेत्रज्ञाचा अथवा मानवी अस्मितेचा व त्या परब्रह्माचा संबंध काय? आपल्या अचिंत्य मायारूपी शक्तीनें चैतन्यरूप परमेश्वर सर्व सृष्टीला उत्पन्न करीत असला तरी त्या सृष्टीचा उपभोग व तिच्यांतील

सुखदु:खांचा अनुभव जीवालाच घ्यावा लागतो व सुखदु:खाचा प्रश्न सोडवावयाचा आहे तोही जीवाचाच होय. अशा स्थितींत या मानवी अस्मितेचें स्वरूप काय ? व सृष्टि निर्माणकर्त्याचा आणि तिचा संबंध काय ? हा महत्त्वाचा प्रश्न शिल्लक उरतोच. नुसतें चैतन्य हेंच जगाचें कारण आहे व त्याच्या इच्छाशक्तीनें जग उत्पन्न झालें असें म्हटल्यानें हा प्रश्न सुटत नाहीं. आजच्या शास्त्रज्ञांना नडणाऱ्या या प्रश्नाचें उत्तर गीताकारांनीं पुढीलप्रमाणें दिलें आहे.

**अपरेऽयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥**–अ. ७–५
**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।**
**मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥**–अ. १५–७
**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान् गुणान् ।**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥** –अ. १३–२१
**उपद्रष्टाऽनुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः ॥** –अ. १३–२२
**अनादित्वान्निर्गुणत्वात् परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥** –अ. १३–३१
**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥** –अ. १३–३२
**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥** –अ. १३–३३

हे महाबाहो अर्जुना ! जिनें या जगाचें धारण होतें अशी परा म्हणजे श्रेष्ठ प्रतीची जीवस्वरूपी माझी दुसरी प्रकृति आहे असें समज. माझाच सनातन अंश जीवलोकीं जीव होऊन प्रकृतींत असणारीं मनासह सहा म्हणजे मन व पांच सूक्ष्म इंद्रियें तो आपल्याकडे ओढून घेतो. (जीव हा परमेश्वरी शक्तीचाच अंश आहे अथवा अस्मिता म्हणजे परमेश्वरी स्वरूपच होय असें मानलें तर त्या अचिंत्य, सुखदु:खातीत व अविनाशी स्वरूपाला सांसारिक

सुखदु:खाचीं व मोहाचीं बंधनें कां पडतात याचें स्पष्टीकरण करतांना श्रीकृष्ण म्हणतात : ) कारण प्रकृतींत पुरुष अधिष्ठित झाला म्हणजे प्रकृतीच्या गुणांचा तो उपभोग घेतो. आणि प्रकृतीच्या गुणांचा हा संयोग पुरुषाला बऱ्या वाईट योनींत जन्म घेण्यास कारणीभूत होतो. हा तो प्रकृतीच्या गुणांचा उपद्रष्टा म्हणजे जवळ बसून राहणारा साक्षी, अनुमोदन देणारा, प्रकृतीच्या गुणांत भर घालणारा आणि उपभोग घेणारा त्यालाच या देहांतील परपुरुष, महेश्वर आणि परमात्मा असें म्हणतात. अनादि व निर्गुण असल्यामुळें हा अव्यय परमात्मा शरीरांत राहूनही, हे कौन्तेया, कांहीं करीत नाहीं व त्याला कोणत्याही कर्माचा लेप म्हणजे बंध लागत नाहीं. ज्याप्रमाणें आंकाश चोहोंकडे भरलें असून सूक्ष्म असल्यानें त्याला कशाचाही लेप लागत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा देहांत सर्वत्र रहात असून त्याला कशाचाही लेप लागत नाहीं. ज्याप्रमाणें एकटा सूर्य सर्व जग प्रकाशित करतो, त्याप्रमाणें हे भारता, क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्राला म्हणजे शरीराला प्रकाशित करीत असतो. तात्पर्य, व्यक्त व अव्यक्त अथवा क्षर व अक्षर सृष्टीचें मूलतत्त्व असलेलें परब्रह्म व मानवी देहपिंडांत क्षेत्रज्ञरूपानें वास करून राहणारी अस्मिता ही मुळांत एकच असून "पिण्डीं तें ब्रह्माण्डीं" सर्वत्र एकच पुरुषोत्तम भरलेला आहे असें गीताकारांनीं सांगितलें आहे. याप्रमाणें क्षेत्र व प्रकृति या दोन्ही गोष्टी एक असून प्रकृति म्हणजेच ईश्वराची माया नांवाची त्रिगुणमयी अचिंत्य शक्ति होय, व अस्मिता अथवा आत्मतत्त्व व सृष्टीचें मूल कारण परब्रह्म होय हें आपण पाहिलें. प्रकृति सुद्धां दुसरें तिसरें कांहीं नसून परमेश्वराचीच विभूति आहे. भगवान् म्हणतात :–

**भूमिरापोऽनलो वायु: खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥** –गीता अ. ७–४

"पृथ्वी, पाणी, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि व अहंकार ही माझीच प्रकृति होय." इतकेंच नव्हे, तर प्रकृति, पुरुष व परमेश्वर

अथवा जीव, जगत् व जगदीश्वर अथवा आजच्या परिभाषेप्रमाणें अस्मिता, प्रकृति व जगाचें चैतन्यरूपी आदिकारण हीं एकरूप असून त्यांच्यांत कांहींही भेद नाहींत असें गीताकारांनीं सांगितलें आहे. भगवान् म्हणतात :--

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ अ. २-१७
एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।
अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ अ. ७-६
मत्तः परतरं नान्यत् किंचिदस्ति धनञ्जय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ अ. ७-७
ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।
मत्त एवेति तान् विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ अ. ७-१२
दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ अ. ७-१४
नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।
मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ अ. ७-२५
अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ अ. ८-२१
मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ अ. ९-४
यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।
तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ अ. ९-६
सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।
कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ अ. ९-७
अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।
मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ अ. ९-१६
पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।
वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥ अ. ९-१७
गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ अ. ९-१८

